**उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, कराड, जि. सातारा येथील १७ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र. २५७/आरोग्य-३अ,**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०१ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र जाक्र.आसेआ/ /कक्ष३/टे-०८ उपजिल्हा रुग्णालय, सातारा/अपदे मुदतवाढ/१३०८७-८९/२४, दिनांक १८.०६.२०२४.

२) शासन निर्णय ,वित्त विभाग, क्र.पदनि- २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक- २१.०२.२०२४.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांच्या उपरोक्त वाचा क्र. १ येथील पत्रान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, कराड, जि. सातारा येथील १७ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, कराड, जि. सातारा येथील सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या १७ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. आयुक्तालय, आरोग्य सेवा, मुंबई यांनी सर्व पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध शासन मान्यतेकरीता तात्काळ सादर करावा. यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता वारंवार कालावधी वाढवून मिळणार नाही, याची नोंद घ्यावी.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन व भत्त्यावरील खर्च त्या त्या शासन निर्णयात नमूद लेखाशीर्षातून २०२४-२५ या वर्षाकरीता मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक- २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०११२४९०१३०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.07.01 13:03:32 +05'30'

(अ. भि. मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, सातारा.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव/कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प), सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३अ)

## विवरणपत्र अ

**(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-अपदे-२०२४/प्र.क्र.२५७/आरोग्य-३अ, दि. ०१ जुलै, २०२४ सोबतचे विवरणपत्र)**

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उपजिल्हा रुग्णालय, कराड, जि. सातारा | वैद्यकीय अधिकारी | ०१ |
| | | वैद्यकीय अधिकारी दंत चिकित्सक | ०१ |
| | | बाह्यरुग्ण लिपीक | ०१ |
| | | परिसेविका | ०१ |
| | | अधिपरिचारीका | ०६ |
| | | क्ष-किरण तंत्रज्ञ | ०१ |
| | | दंत यांत्रिक | ०१ |
| | | प्रयोगशाळा सहायक | ०१ |
| | | कक्षसेवक | ०२ |
| | | अपघात विभाग सेवक | ०१ |
| | | सहायक गट-ड | ०१ |
| | | **एकुण अस्थायी पदे-** | **१७** |